**पुणे शहर आयुक्तालयांतर्गत सीसीटीव्ही फेज-२ रुपये ५१२.८४ कोटीच्या खर्चास सुधारीत प्रशासकीय मान्यता देणे.**

# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण ३६२३/प्र.क्र.५०/पोल-३

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : २८ एप्रिल, २०२५.

**वाचा :**

१. शासन निर्णय,गृह विभाग क्र. आयएसएस-१००९/प्र.क्र.३१३/विशा-४,दि.२७ जुलै,२०११.
२. पोलीस आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र. प्रशा-६/सीसीटीव्ही कॅमेरा/७८४२/२०१२,दि.७.८.२०१२.
३. शासन निर्णय, गृह विभाग, क्र.आयएसएस-१०१२/प्र.क्र.७१/विशा-४, दि.१४.१०.२०१३
४. अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि. ९.१०.२०२३, दि.८.१.२०२४, दि.३०.९.२०२४, दि.१३.२.२०२५ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
५. शासन निर्णय, सामान्य प्रशासन (माहिती तंत्रज्ञान) विभाग क्र. मातंसं-१७१६-३६१५/प्र.क्र.२८६/३९, दि.९.८.२०१६, दि.२०.३.२०१८, दि.९.५.२०१९, दि.५.१०.२०२३
६. शासन निर्णय, वित्त विभाग, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२३ दि.१२.४.२०२३.
७. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१०/२४/कोषा.प्रशा-५,दि.१४.२.२०२४
८. शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण ३६२३/प्र.क्र.५०/पोल-३,दि.२६.२.२०२४
९. पोलीस आयुक्त, पुणे शहर यांचे पत्र जा.क्र.पशा-६/सीसीटीव्ही फेज-२/ निधी/२०२५/३८५, दि.२४.३.२०२५
१०.अपर पोलीस महासंचालक, (नि. व स.) यांचे पत्र क्र. पोमसं /१७ /पुणे शहर CCTV प्रकल्प/३५/२०२१,दि.२१.१०.२०२४
११.अपर पोलीस महासंचालक, (नि. व स.) यांचे पत्र क्र. पोमसं /१७ /पुणे शहर सीसीटीव्ही/१७/२०२१,दि.४.४.२०२५

**प्रस्तावना :**

पुणे येथे दि.१.८.२०१२ रोजी झालेल्या बॉम्ब स्फोटाच्या पार्श्वभूमीवर पुणे शहराच्या सुरक्षेच्या दृष्टीने सीसीटीव्ही यंत्रणा बसविणे गरजेचे होते. त्यानुषंगाने आवश्यक निविदा प्रक्रीया गृह विभाग, शासन निर्णय दि.२७.७.२०११ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीने पार पाडली असून अंतिम निविदाकाराची निवड केली. पोलीस आयुक्त, पुणे शहर यांचे अधिनस्त पुणे व पिंपरी -चिंचवड शहरांमध्ये सीसीटीव्ही प्रकल्प राबविण्याबाबत मे.अलाईड डिजीटल सर्व्हीसेस लि.कंपनीला दि.१७.९.२०१३ रोजी इरादापत्र (Letter of intent) देण्यात आले होते. गृह विभाग, शासन निर्णय दि.१४.१०.२०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर प्रकल्पास व त्यासाठी

येणाऱ्या रु.२२५ कोटी इतक्या रक्कमेच्या खर्चाच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्यात आली. पुणे व पिंपरी-चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्प दि.२७.१०.२०१५ रोजी कार्यान्वित (Go-Live) झाला आहे.

२. तद्नंतर पुणे शहर आयुक्तालयांतर्गत सीसीटीव्ही फेज-२ DPR-RFP ला मान्यता देणे व रु.४३८.२२ कोटीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेचा शासन निर्णय दि.२६.२.२०२४ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

३. दि.३०.९.२०२४ रोजीच्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीत "पुणे शहर आयुक्तालयांतर्गत सीसीटीव्ही फेज-२ करिता जीएसटीसह रु.४३३,४४,३४,०२०/- इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत" शासन पूरक पत्र निर्गमित करण्यात यावे असा निर्णय घेण्यात आला. तद्नंतर दि.१३.२.२०२५ रोजीच्या अ.मु.स.(गृह) यांचे अध्यक्षतेखाली उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीत पुणे शहर हद्दीतील घाट,टेकडी, डोंगर व निर्जन क्षेत्रे अशा ठिकाणच्या ब्लॅक स्पॉटवर Night Vision कॅमेरे लावून गुन्हेगारी कृत्यास आळा घालण्याबाबत प्रकल्प अंमलबजावणी समितीने पुणे सीसीटीव्ही प्रकल्पाच्या दुसऱ्या व तिसऱ्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार सीसीटीव्ही यंत्रणा कार्यान्वित करण्यासाठी रु.७९.४० कोटी इतका अतिरिक्त निधी वितरीत करणेबाबत मंजूरी देण्यात आली आहे. त्यामुळे पुणे शहर सीसीटीव्ही फेज-२ अंतर्गत येत असल्याने मूळ प्रशासकीय मान्यतेच्या रक्कमेत वाढ होत आहे. याबाबत पोलीस महासंचालक कार्यालयाकडून दि.४.४.२०२५ रोजी पत्राद्वारे पुणे शहर सीसीटीव्ही फेज-२ च्या कामासाठी रक्कम रु.४३३,४४,३४,०२०/- (जीएसटीसह) व पुणे शहर हद्दीतील येत असलेले घाट, टेकडी, डोंगर व निर्जन क्षेत्र अशा ठिकाणच्या ब्लॅक स्पॉटवर Night Vision CCTV कॅमेरे लावणेच्या अनुषंगाने अतिरिक्त मंजूर करण्यात आलेली जीएसटीसहरक्कम रु.७९.४० कोटीच्या खर्चाचा समावेश करुन एकत्रित रक्कम रु.५१२,८४,३४,०२०/- (अक्षरी रुपये पाचशे बारा कोटी चौऱ्याऐंशी लाख चौतीस हजार वीस फक्त) जीएसटीसह इतक्या रकमेच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती करण्यात आली त्यानुसार सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय :

पुणे शहर सीसीटीव्ही फेज-२ च्या कामासाठी रक्कम रु.४३३,४४,३४,०२०/- (जीएसटीसह) व पुणे शहर हद्दीतील येत असलेले घाट, टेकडी, डोंगर व निर्जन क्षेत्र अशा ठिकाणच्या ब्लॅक स्पॉटवर Night Vision CCTV कॅमेरे लावणेच्या अनुषंगाने अतिरिक्त मंजूर करण्यात आलेली जीएसटीसह रु.७९.४०

कोटीच्या खर्चाचा समावेश करुन एकत्रित रक्कम रु.५१२,८४,३४,०२०/- (अक्षरी रुपये पाचेश बारा कोटी चौऱ्याऐंशी लाख चौतीस हजार वीस फक्त) जीएसटीसह इतक्या रकमेच्या कामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी येणारा खर्च "मागणी क्र.बी-१०, ४०५५-पोलीस यावरील भांडवली खर्च, ८०० इतर खर्च, (००) (०९) सीसीटीव्ही संनियंत्रण यंत्रणा बसविणे (अनिवार्य) (४०५५ ०२२३)-५२,यंत्रसामग्री व साधनसामग्री" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या-त्या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८,भाग-पहिला,उपविभाग-दोन,महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम,१९६५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार, प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर प्रकल्पांचा निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी पोलीस आयुक्त,पुणे यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून तसेच त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्याला "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून याद्वारे घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या WWW.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४२८१८४२१७८१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA TANAJI BHALWANE

Digitally signed by RAJENDRA TANAJI BHALWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=38d121bf4a170d16dacf98520f0ac44551976931d2758148ccaa24d1fb27b9df, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=BADFC0DAA40CC485400AAD9CEABCD514095659A6CDFAC856815518DCD188C23A, cn=RAJENDRA TANAJI BHALWANE
Date: 2025.04.28 18:43:23 +05'30'

**( रा. ता. भालवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मुख्य सचिव, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. मा. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. पोलीस आयुक्त, पुणे शहर.

९. पोलीस आयुक्त, पिंपरी चिंचवड
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र ½, मुंबई/नागपूर.
११. अधिदान व लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१३. आयुक्त, पुणे महानगरपालिका.
१४. आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका.
१५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१६. वित्त विभाग, व्यय-७/ वित्तीय सुधारणा कार्यासन, मंत्रालय, मुंबई
१७. कक्ष अधिकारी (अर्थसं-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. निवडनस्ती, पोल-३.